**शिवाजीनगर, पुणे येथील एस.टी. स्थानक व त्यांचे प्रशासकिय कार्यालय तात्पुरत्या स्वरुपात स्थलांतरीत करण्यासाठी दुग्धव्यवसाय विभागाची जागा ३ वर्षाच्या कालावधीसाठी करारनाम्याने उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: दुवियो-१३१८/प्र.क्र.११३/पदुम-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ०२ जानेवारी, २०१९

**संदर्भ** - १) महानगर आयुक्त तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,पुणे यांचे पत्र क्र. जमिन व मालमत्ता /मेट्रो/१८/प्र.क्र.४७ , दि.२३.०४.२०१८
२) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे मेट्रो रेल प्रकल्प यांचे पत्र क्र. महामेट्रो / पीएमआरपी / लँण्ड/ २०१८, दि.०९.१०.२०१८
३) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्र. आदुवि -१६ (८) / पुणे जमिन / पुणे मेट्रो/ प्र. क्र.१९ /२०१८ /२९७८, दि.२८.०६.२०१८
४) प्रादेशिक दुग्ध विकास अधिकारी, पुणे प्रादेशिक दुग्ध विकास अधिकारी, पुणे यांचे पत्र क्र. प्रादुविअ /पुणे /ग-१/ न.क्र.२९ (२०१८-१९)/पुणे जमिन/मेट्रो डेपा / ४४९३/२०१८, दि. ०३.११.२०१८

**प्रस्तावना-**

दुग्धव्यवसाय विभागाच्या पुणे येथील सर्व्हे क्र.१६ /१, १७/१, १८ -अ, १९ -क, २१/१-२, २२-अ,२२-ब व क मधील पुणे महानगर प्रदेश प्राधिकरण यांच्या हिंजवडी ते शिवाजीनगर मेट्रोसाठी ४ हेक्टर इतकी जमिन कायमस्वरुपी उपलब्ध करुन देण्याबाबत दि.२३.०४.२०१८ रोजीच्या पत्रान्वये मागणी करण्यात आली होती. तसेच, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे मेट्रो रेल प्रकल्प यांनी दि.०९.१०.२०१८ रोजीच्या पत्रान्वये मार्गिका क्र.१ चे शिवाजीनगर येथे भुयारी मेट्रो स्थानकाचे काम सुरु करण्यासाठी या जागेवरील शिवाजीनगर एस.टी. स्थानक व त्यांचे प्रशासकिय कार्यालय दुग्धव्यवसाय विभागाच्या मालकीची दुग्धविकास योजना, शिवाजीनगर, वाकडेवाडी, पुणे येथील सर्व्हे क्र. २१ / १-२ , २२- ब, येथील ०२.०० हेक्टर क्षेत्रफळाच्या जागेत स्थलांतरीत करण्यासाठी ३ वर्षाच्या ( तीन वर्षे ) इतक्या कालावधीसाठी भाडेपटटयांने उपलब्ध करुन देण्याची मागणी केलेली आहे.

२. पुणे महानगर प्रदेश प्राधिकरण यांच्या मागणीच्या अनुषंगाने आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांच्या दि.२८.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये विभागाच्या जागेवरील बांधकामे विभागाच्या उर्वरित जागेवर पुर्नस्थापित करुन देण्याच्या अटीवर मान्यता देण्याबाबतचा निर्णय शासन स्तरावर घेण्यात यावा, असे कळविलेले आहे. महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे मेट्रो रेल प्रकल्प यांच्या मागणीच्या अनुषंगाने प्रादेशिक दुग्ध विकास अधिकारी, पुणे यांच्या दि.०३.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये अहवाल सादर करुन शासन स्तरावरुन निर्णय घेण्यात यावा, असे कळविलेले आहे. पुणे महानगर प्रदेश

प्राधिकरण आणि महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे मेट्रो रेल प्रकल्प यांनी या विभागाकडील एकाच जमिनीची मागणी केल्याचे निदर्शनास आलेले आहे. मेट्रो रेल प्रकल्प हा शासनाचा महत्वाकांक्षी प्रकल्प असल्याने दोन्ही प्राधिकरणांपैकी एका प्राधिकरणाची मागणी मान्य करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

शासन, या निर्णयान्वये, पुणे महानगर प्रदेश प्राधिकरण यांच्या हिंजवडी ते शिवाजीनगर मेट्रोसाठी ४ हेक्टर इतकी जमिन कायमस्वरुपी उपलब्ध करुन देण्याची मागणी अमान्य करण्यात येत असून, दुग्धव्यवसाय विकास विभागाअंतर्गत शासकिय दुग्धविकास योजना, शिवाजीनगर, वाकडेवाडी, पुणे यांच्याकडील सर्व्हे क्र. २१ / १-२ , २२- ब, मधील ०२.०० हेक्टर ( दोन हेक्टर ) इतकी जागा महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे मेट्रो रेल प्रकल्प यांना शिवाजीनगर, पुणे येथील एस.टी. स्थानक व त्यांचे प्रशासकिय कार्यालय स्थलांतरीत करण्यासाठी ३ वर्षाच्या (तीन वर्षे ) कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून भाडेपटटयांने देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती -**

१ ) ज्या प्रयोजनासाठी जागा मंजूर करण्यात आलेली आहे, फक्त त्याच प्रयोजनासाठी जागेचा वापर करण्यात यावा. अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी या जमिनीचा अथवा जमिनीच्या कोणत्याही भागाचा वापर करावयाचा झाल्यास शासनाच्या दुग्धविकास विभागाची पूर्व मान्यता आवश्यक राहील

२) सदर जागेचे इतर कोणासही हस्तांतरण / फेरवाटप / पोटविभाजन ( Sub lease / Sub let ) करता येणार नाही. तसेच या जमिनीवर अथवा जमिनीच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती / संस्था / कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार करता येणार नाही.

३ ) प्रस्तूत जमिनीवरील दुग्धव्यवसाय विभागाची वापरात असलेली कार्यालये/निवासस्थाने यांची पर्यायी व्यवस्था महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे यांच्यामार्फत करणे आवश्यक राहिल.

४) विषयांकित जमिनीवर बांधकाम करण्यासाठी प्रचलित नियमावलीनुसार व आवश्यकतेप्रमाणे संबंधित विभाग / शासकिय यंत्रणा यांची पूर्व परवानगी / मान्यता / ना - हरकत प्रमाणपत्र इत्यादी. घेणे बंधनकारक राहील.

५) तीन वर्षाचा कालावधी संपल्यानंतर मुदतवाढ मागणीची आवश्यकता भासणार नाही याकरीता महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे यानी त्यांची कामे त्वरीत सुरु करुन विहित कालमर्यादेत पूर्ण करुन मुदत संपताच जमिन विभागास परत करणे आवश्यक राहिल.

६) सदर जागेचे अतिक्रमणापासून संरक्षण करण्याची जबाबदारी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे यांची राहील.

७) सदर जागेचे भाडे हे सार्वजनिक बांधकाम विभागाने निश्चित केलेल्या दरानुसार राहील व प्रचलित नियमानुसार त्यामध्ये प्रतिवर्षी संबंधित जमिनीच्या वार्षिक दर विवरणपत्राप्रमाणे येणाऱ्या किमतीवर निश्चित करण्यात येईल.

८) सदर जागेचे प्रतिवर्षी भाडेमूल्य त्या त्या वर्षात वसूल करण्याची जबाबदारी प्रादेशिक दुग्ध विकास अधिकारी, पुणे यांची राहील.

९) प्रस्तावाधीन जमिन तीन वर्षाच्या कालावधीकरीता तात्पुरत्या स्वरुपात देण्याबाबतचा करारानामा आयुक्त (दुग्ध) यांनी प्रमाणित केल्यानंतर या अनुषंगाने महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे मेट्रो रेल प्रकल्प यांचे समवेत करारनामा करण्यासाठी प्रादेशिक दुग्ध विकास अधिकारी, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

१०) करारनाम्याची मुदत संपल्यानंतर सदरहू जागा मोकळया स्वरुपात उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे यांची राहील.

११) सदर जमिन मंजूर करण्याबाबत अटी व शर्तींचा भंग झाल्यास जमिन या विभागाकडून परत घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०२१३१८५१७२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2019.01.02 13:38:14 +05'30'

**( अनूप कूमार )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई ३२
४) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई ३२
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ३२
६) प्रधान सचिव, ( नवि -१ ), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
८) प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
९) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, विधान भवन, पुणे ४११ ००१
१०) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई

११) आयुक्त, पुणे महानगर पालिका, पुणे
१२) जिल्हाधिकारी, पुणे जिल्हा, पुणे
१३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पो.लि. पुणे मेट्रो रेल प्रकल्प, ओरियन बिल्डींग, अर्जुन मनसुखानी मार्ग, कोरेगाव पार्क, पुणे - ४११ ००१
१४) महानगर आयुक्त तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे
१५) प्रादेशिक दुग्ध विकास अधिकारी, पुणे प्रादेशिक दुग्ध विकास अधिकारी, पुणे
१६) निवड नस्ती, पदुम-९.